**सन २०१५-१६ मधील महिला विकासाशी संबधीत ३१- सहाय्यक अनुदाने योजनेत्तर व योजनांतर्गत लेखाशिर्षाखालील मंजूर अनुदान वितरीत करणेबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**महिला व बाल विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : अर्थसं-२०१५/प्र.क्र. २५९ /२०१५ /का-२**
नवीन प्रशासकीय इमारत, ३रा मजला,
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : २३ ऑक्टोंबर, २०१५.

<u>वाचा</u> : १) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०१५/प्र.क्र.८५/अर्थ-३, दि.१७ एप्रिल, २०१५

२) महिला व बाल विकास विभागाचे क्रमांक- बीजीटी-२०१५/प्र.क्र.३५/का-४, दिनांक २९ एप्रिल,२०१५ चे ज्ञापन.

३) आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, पुणे यांचे क्रमांक- मबाविआ/ मवि/निधी/अनौ.संदर्भ/२०१५-१६/५०२०,दिनांक ११/९/२०१५ चे पत्र.

<u>प्रस्तावना</u> :-

सन २०१५-१६ या आर्थिक वर्षासाठी महिला व बाल विकास विभागातील मागणी क्रमांक- एक्स-१ खालील **३१- सहाय्यक अनुदान** वेतनेत्तर **(योजनेत्तर व योजनांतर्गत)** या तपशिलवार लेखाशिर्षाखाली अर्थसंकल्पात मंजूर झालेल्या सोबत जोडलेल्या परिशिष्ठातील स्तंभ-३ मधील निधीपैकी ७०% च्या प्रमाणात निधी वित्त विभागाच्या संदर्भाधीन-१ च्या आदेशानुसार अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर (BDS ) वितरीत करण्यात आलेला आहे. तसेच सदरचा निधी संबधित प्रशासकीय विभागाने त्यांच्या स्तरावर संबधित नियंत्रक अधिकारी / आहरण व संवितरण अधिकारी यांना वितरीत करण्यास मान्यता दिलेली आहे.

<u>शासन निर्णय</u>:-

वरील पार्श्वभूमीवर सन २०१५-१६ करीता महिला व बाल विकास विभागाअंतर्गत सोबत जोडलेल्या परिशिष्ठातील स्तंभ-३ मधील मागणी क्रमांक. एक्स-१ खालील **३१- सहाय्यक अनुदान वेतनेत्तर (योजनेत्तर व योजनांतर्गत)** या तपशिलवार लेखाशिर्षाखाली अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर उपलब्ध झालेला मधील निधी कोषागारातून आहरित करता यावा, यासाठी **सदरहु परिशिष्ठातील स्तंभ-४ मध्ये नमूद केलेला** एकूण मंजूर तरतूदीच्या अनुषंगाने खर्चाच्या ७०% निधीचे वितरण करण्यास या आदेशान्वये शासन मंजूरी देण्यात येत आहे.

२. याबाबत आयुक्त, महिला व बाल विकास विभाग, पुणे यांच्या संदर्भाधीन क्रमांक-३ च्या पत्रान्वये दिलेल्या अभिप्रायानुसार असे प्रमाणित करण्यात येते की, वित्त विभागाच्या संदर्भाधीन-१ येथील दिनांक १७ एप्रिल, २०१५ च्या शासन निर्णयात नमूद केलेल्या तपासणी सूचीतील बाबींची तसेच त्या आदेशातील परिच्छेद-७ ते परिच्छेद-१८ मधील लागू होणाऱ्या अटींची याप्रकरणी पुर्तता होत असलयाबाबत विभागाची खात्री झालेली आहे.

३. याबाबत आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना या योजनेसाठी नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

४. याबाबत सन २०१५-१६ करीता मागणी क्रमांक- एक्स-१ खालील **३१- सहाय्यक अनुदान वेतनेत्तर (योजनेत्तर व योजनांतर्गत)** या तपशिलवार लेखाशिर्षाखाली अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर उपलब्ध करून दिलेला निधी खर्च होईल व त्याबाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास सादर करणे, याची दक्षता आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, पुणे यांनी घ्यावी.

५. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने त्यांच्या संदर्भाधीन दिनांक १७.४.२०१५ च्या परिपत्रकान्वये प्रशासकीय विभागास दिलेल्या अधिकारांस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संकेतांक क्रमांक २०१५१०२३१५०३३२४१३० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

DALVI VINOD VASANT

Digitally signed by DALVI VINOD VASANT
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WOMEN AND CHILD DEVELOPMENT,CID - 917996, postalCode=400032, st=Maharashtra, cn=DALVI VINOD VASANT
Date: 2015.10.26 11:49:37 +05'30'

(वि.व. दळवी)
कार्यासन अधिकारी

**प्रति,**

१) आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
२) महालेखापाल १/२, (लेखा व अनुज्ञेयता)/ (लेखा परिक्षा), मुंबई / नागपूर.
३) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई शहर / मुंबई उपनगर
४) वरिष्ठ जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.
५) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.
६) सर्व जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी,
७) वित्त विभाग (व्यय-६)(अर्थसंकल्प-७), मादाम कामा रोड, मंत्रालय, मुंबई.
८) अवर सचिव (अर्थसंकल्प), महिला व बाल विकास, मंत्रालय, मुंबई.
९) सर्व अधिकारी, महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०) निवड नस्ती, का-२

**परिशिष्ठ-अ**

**सन २०१५-१६ मधील महिला विकासाशी संबधीत ३१-सहाय्यक अनुदाने योजनेत्तर व योजनांतर्गत लेखाशिर्षाखालील मंजूर अनुदान वितरीत करणेबाबत**

(शासन निर्णय क्रमांक : अर्थसं-२०१५/प्र.क्र. २५९ /२०१५ /का-२, दिनांक १६/१०/२०१५ सोबतचे सहपत्र)

| अ.क्र. | योजनेचे नाव / उपलेखाशिर्ष | सन २०१५-१६ साठीची अर्थसंकल्पीय तरतूद | अर्थसंकल्पीय तरतूदीच्या ७० % मर्यादेतील वितरीत करावयाची रक्कम | अभिप्राय |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| | **योजनेत्तर योजना** | | **(रूपये हजारात)** | |
| १) | स्वागतकेंद्र, राज्यगृहे व संरक्षणगृहे. (२२३५ -१२५-४) ३१ सहायक अनुदान (वेतनेत्तर) | ९,८३ | ६,८८ | |
| २) | आधारगृहे. (२२३५ -१२८-१) ३१ सहायक अनुदान (वेतनेत्तर) | ३१,९० | २२,३३ | |
| ३) | देवदासी पुनर्वसन योजना (२२३५ -१८५-३) ३१ सहायक अनुदान (वेतनेत्तर) | १५,०० | १०,५० | |
| ४) | महिला मंडळांना अनुदाने (२२३५ -२१३-४) ३१ सहायक अनुदान (वेतनेत्तर) | ६५,०० | ४५,५० | |
| ५) | महिलांसाठी बहुउद्देशिय समाज केंद्रांची स्थापना. (२२३५ -२९४-९) ३१ सहायक अनुदान (वेतनेत्तर) | ६,५० | ४,५५ | |
| | **योजनांतर्गत योजना** | | **(रूपये हजारात)** | |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| १) | विद्यावेतन (२२३५ -३२३-९) ३१ सहायक अनुदान (वेतनेत्तर) | ४,९० | ३,४३ | |
| २) | स्वयंरोजगार (२२३५ -३२४-८) ३१ सहायक अनुदान (वेतनेत्तर) | १४,७२ | १०,३० | |
| ३) | हुडा पध्दतीचे निर्मुलन (२२३५ -१३८-१) ३१ सहायक अनुदान (वेतनेत्तर) | ४,०८ | २,८५ | |
| ४) | देवदासी पुर्नवसन योजना (२२३५ -१३९-९) ३१ सहायक अनुदान (वेतनेत्तर) | १,२६ | ८८.२ | |
| ५) | महिला व बाल कल्याण समिती (२२३५ -३२६-६) ३१ सहायक अनुदान (वेतनेत्तर) | १८,१३,३१ | १२,६९,३१ | |
| ६) | शुभमंगल सामुहिक विवाह (२२३५ -३२०-१) ३१ सहायक अनुदान (वेतनेत्तर) | ६१.२४ | ४२.८६ | |
| ७) | मनोधैर्य योजना (२२३५ बी-१८३) ३१ सहायक अनुदान (वेतनेत्तर) | ८,९९,८९ | ६,२९,९२ | |